सन २०१९-२० करीता भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत केंद्रशासनाकडुन प्राप्त निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१९/प्र.क्र.६३/का.-१९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः ११/१२ /२०१९

**वाचा -**

१. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.No.११०१५/०१/२०१९-Grants,(pt), दि.२३/०८/२०१९.
२. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.No.११०१५/०१/२०१९-Grants,(pt) ,दि.२०/०९/२०१९.
३. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०२(१४)/२०१९-Grants,दि.२६/११/२०१९

**प्रस्तावना -**

भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) योजनेअंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता वाचा क्र.१ येथील पत्रान्वये अतिरिक्त निधी करिता प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते. त्यानुसार भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) योजनेअंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता अतिरिक्त प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावांच्या अनुषंगाने जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली येथे प्रकल्प मुल्यमापन समितीची (Project Appraisal Committee-PAC) बैठक दि. ०४/०९/२०१९ रोजी आयोजित करण्यात आलेली होती. या बैठकीच्या वाचा क्र. २ वरील इतिवृत्तान्वये केंद्र शासनाने एकुण रु.४५१३.०६ लक्ष निधीच्या प्रस्तावांना मान्यता प्रदान करून वाचा क्र.३ वरील पत्रान्वये रु. ३४५२.०६ लक्ष इतका निधी वितरीत केला आहे. सबब, सदर निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

केंद्र शासनाने सन २०१९-२० करिता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत वितरित एकूण रु. ३४५२.०६ लक्ष (रु.चौतीस कोटी बावन्न लक्ष सहा हजार फक्त) निधी पुढील कामाकरीता खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | योजना राबविणारी यंत्रणा | सन २०१९-२० करीता अतिरिक्त मंजूर निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | Furniture for Ashram Schools | आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक | ३४५२.०६ | ३४५२.०६ |
| | | **एकूण** | ३४५२.०६ | ३४५२.०६ |

२. उपरोक्त **रु.** ३४५२.०६ लक्ष (रु.चौतीस कोटी बावन्न लक्ष सहा हजार फक्त) खर्च मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागसवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२) (४३) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य (केंद्र योजना), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२२५ E०३३) यामधील सन २०१९-२० करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरित करून संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना वितरित करण्याकरिता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी तातडीने आहरीत व वितरित करण्याची दक्षता घ्यावी.

४. केंद्र शासनाच्या संदर्भाधिन पत्र क्र.२ मध्ये नमुद केल्याप्रमाणे फ़र्निचर खरेदी GeM पोर्टलच्या माध्यमातुन केलेली असावी. तसेच ज्या आश्रमशाळांकरीता फ़र्निचर खरेदी करण्यात येणार आहे अशा सर्व आश्रमशाळांच्या स्थानाविषयीची माहिती शासनास सादर करावी.

५. केंद्र शासनाकडुन मंजुर सर्व योजनांचा मासिक प्रगती अहवाल संबंधित अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी यांच्याकडुन प्राप्त करुन घेवुन दरमहा १० तारखेच्या आत शासनास सादर करणे व कार्यान्वित असलेल्या योजनांसंदर्भात पुढील निधी संबंधितांना वितरित करण्यापुर्वी त्या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल व झालेल्या खर्चाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करुन घेण्याची जबाबदारी आयुक्त,आदिवासी विकास , नाशिक यांची राहील.

६. ज्या योजना संबंधित प्रकल्प अधिका-यांच्या कार्यक्षेत्रात राबविल्या जातील त्या योजनांच्या लाभार्थ्यांची यादी व Geotagged Photographs हे www.stcmis.gov.in /smis या वेबसाईट वर अपलोड करावेत. प्रकल्प राबविल्याबाबतचा आवश्यक दस्ताऐवज संबंधित प्रकल्प अधिका-यांमार्फत ठेवण्यात येवून तो योग्य प्रकारे जतन केला जाईल याची दक्षता संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्याकडून घेण्यात यावी व योजनांची कालबद्ध अंमलबजावणीची संपूर्ण जबाबदारी संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांची राहील.

७. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४३५ दिनांक ९/१२/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१२१२१३५७३३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje
Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2019.12.12 12:18:35 +05'30'

**( प्रकाश वाजे )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सहसचिव /उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. अपर आयुक्त,आदिवासी विकास,ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
७. अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
८. जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक
९. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१०.नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अवर सचिव, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.